**समग्र शिक्षा या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत शिक्षक शिक्षण या योजनेसाठी सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षातील अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षांतर्गत उर्वरित केंद्र शासनाचा हिस्सा व त्यास अनुसरुन राज्य शासनाचा समरूप हिस्सा वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः निधिवि-२०२०/प्र.क्र.५०/प्रशिक्षण**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : - ७ सप्टेंबर, २०२०

**वाचा -**

१) मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ. क्र.७-२/२०२०- आय एस -१२ ( एससी ) दिनांक २७ एप्रिल, २०२०
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२०/प्र.क्र.०४/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २५ ऑगस्ट, २०२०
४) शालेय शिक्षण विभाग समक्रमांकित शासन निर्णय दि. २१ जुलै २०२०

**प्रस्तावना -**

सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षातंर्गत दिनांक २७ एप्रिल, २०२० च्या पत्रान्वये रु.१०८.१७ लाख इतका निधी तदर्थ स्वरूपात वितरीत केला आहे. त्याअनुषंगाने ४०% प्रमाणे राज्य हिस्सा रू. ७२.११ लाख असा एकूण १८०.२८ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

केंद्र शासनाने दिनांक २७ एप्रिल, २०२० रोजीच्या पत्रान्वये शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्रपुरस्कृत योजनेअंतर्गत अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षाखाली सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाकरिता अग्रीम हप्त्याचा वितरीत केलेला निधी रु.१०८.१७ लाख ( रु. एक कोटी आठ लाख सतरा हजार फक्त ) व त्यास समरूप राज्य हिस्सा ( ४०% ) रु. ७२.११ लाख असा एकूण रु. १८०.२८ लाख इतक्या निधीपैकी शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णय दि. २१ जुलै २०२० अन्वये ०१- वेतन या उद्दिष्टाखालील केंद्र व राज्य हिस्सा मिळून एकूण रु. १६७.३४ लाख इतकी तरतूद वितरित करण्यात आलेली आहे. आता, केंद्र शासनाच्या हिस्स्यापोटी रु. ७.७६ लाख ( रु. सात लाख शहाहत्तर हजार फक्त ) व राज्य शासनाच्या

हिस्स्यापोटी रु. ५.१८ लाख ( रु. पाच लाख आठरा हजार फक्त ) अशा एकूण रु. १२.९४ लाख तरतूद खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(रु. हजारात)

| **उद्दिष्ट** | **२२०२I७४६<br>केंद्र हिस्सा** | **२२०२I७५५<br>राज्य हिस्सा** |
|---|---|---|
| दुरध्वनी, वीज व पाणी | १९४ | १३० |
| प्रवास खर्च | २९१ | १९४ |
| कार्यालयीन खर्च | २९१ | १९४ |
| **एकूण** | **७७६** | **५१८** |

२. केंद्र शासनाने सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षासाठी अग्रीम हप्त्याकरिता वितरीत केलेला निधी रु. ७.७६ लाख इतका निधी मागणी क्र.एन-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, ७८९ अनुसूचित जाती साठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजना (०१) (०३) समग्र शिक्षा अभियान (२२०२I७४६) (केंद्र हिस्सा ६० टक्के ) या लेखाशीर्षातून व राज्य हिस्सा करिता रु. ५.१८ लाख इतका निधी मागणी क्र. एन-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, ७८९ अनुसूचित जाती साठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजना (०१) (०४) समग्र शिक्षा अभियान (२२०२I७५५) (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशीर्षातून या उद्दिष्टाखाली सन-२०२०-२०२१ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर निधी अहरित करून वितरीत करण्यासाठी अवर सचिव/कक्ष अधिकारी ( लेखाशाखा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तर उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या १६ एप्रिल २०२०, ४ मे २०२० व १८ मे २०२० च्या शासन निर्णय / परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा.

५. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर वितरीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर रक्कमा संचालक, समग्र शिक्षा अभियान, मुंबई यांनी समग्र शिक्षा योजनेच्या खात्यात जमा करून मागणीनुसार संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांना उपलब्ध करून देण्यात याव्यात.

६. हा शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ३७४/२०२०/व्यय-१४, दिनांक ०३ सप्टेंबर, २०२० व सामाजिक न्याय विभागाचा शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२०/प्र.क्र.०४/अर्थसंकल्प (विघयो) दिनांक २५ ऑगस्ट, २०२० नुसार दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००९०३१६१०४६०४२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.09.07 17:58:37 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (सामाजिक न्याय विभाग), यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र शासन, पुणे
७. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, चर्नीरोड, मुंबई.
८. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
९. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र पुणे
१०. शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक), महाराष्ट्र राज्य पुणे
११. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
१३. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
१५. सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१८ अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. निवडनस्ती (प्रशिक्षण)